**जिल्हा नियोजन भवन, नंदूरबार च्या एकूण रुपये ९५३.७५ लक्ष इतक्या रकमेच्या अंदाजपत्रकास सुधारीत प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**नियोजन विभाग**

**शासन निर्णय क्रमांक : डिएपी-१०२१/प्र.क्र.३६/का.१४८१**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,

मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.

दिनांक : १८ एप्रिल, २०२२.

**वाचा:** १) नियोजन विभाग, शासन निर्णय क्र :- जिवायो-१००७ / प्र.क्र.३९ / का.१४४४, दिनांक १६ फेब्रुवारी, २००८.

२) जिल्हाधिकारी, नंदूरबार यांचे प्रशासकीय मान्यता आदेश क्रमांक-संस-१/जिवायो/प्रमा आदेश/२०१६-१७, दिनांक २१/१०/२०१६

३) जिल्हाधिकारी तथा सदस्य सचिव, जिल्हा नियोजन समिती, नंदूरबार यांचे पत्र क्रमांक: जिनिसनं/जिवायो-(सर्व) निभवन सुधारीत प्रस्ताव/२०२०-२१/५५५, दिनांक २५/०६/२०२१

**प्रस्तावना :-**

जिल्हा वार्षिक योजना (सर्वसाधारण) अंतर्गत निधी अर्थसंकल्पित करणे, वितरीत करणे व या निधीतील कामांना प्रशासकीय मान्यता देण्याची कार्यपध्दती नियोजन विभागाच्या संदर्भाधीन शासन निर्णय दिनांक १६ फेब्रुवारी २००८ अन्वये विहित करण्यात आली आहे. त्यानुसार जिल्हा नियोजन भवन, नंदूरबार च्या बांधकामाकरीता जिल्हाधिकारी तथा सदस्य सचिव, जिल्हा नियोजन समिती, नंदूरबार यांच्या संदर्भाधिन दिनांक २१/१०/२०१६ च्या आदेशान्वये रुपये ५९९.५९ लक्ष च्या खर्चास प्रशासकीय मान्यता देण्यात आली होती. तदनंतर न्यायालयीन प्रक्रियेमुळे दिनांक १६/१२/२०१७ ते दिनांक १७/१०/२०१८ या कालावधीत विलंब झाल्याने बांधकाम साहित्याचे वाढलेले दर, GST १२ टक्के दरवाढ झाल्याने तसेच इमारतीकरीता लागणारे अंतर्गत व बाहय विद्युतीकरण, अंतर्गत फर्निचर, आग प्रतिबंधक उपाययोजना व आवारातील डांबरी रस्ते हयाकरीता अतिरिक्त निधीची आवश्यकता भासत असल्याने रुपये ९५३.७५ लक्ष खर्चास सुधारीत प्रशासकीय मान्यता देण्याची विनंती संदर्भाधिन क्रमांक ३ च्या पत्रान्वये करण्यात आली आहे.

जिल्हा नियोजन भवन, नंदूरबार च्या बांधकामासंदर्भात सादर केलेल्या रुपये ९५३.७५ लक्ष च्या प्रस्तावास “सुधारीत प्रशासकीय मान्यता” देण्याची बाब शासनाचे विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

जिल्हा नियोजन भवन, नंदूरबार बांधकामाच्या सुधारीत प्रशासकीय मान्यता प्रस्तावाची छाननी करुन सार्वजनिक बांधकाम विभाग तसेच दिनांक २४/०२/२०२२ रोजी झालेल्या व्यय अग्रक्रम समितीच्या बैठकीत दिलेल्या मंजूरीनुसार जिल्हा नियोजन भवन, नंदूरबार बांधकामास

पुढील अटींच्या अधिनतेने रुपये ९५३.७५ लक्ष एवढया वाढीव खर्चास सुधारीत प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

१) मंजूरी प्राप्त कामांच्या संकल्प चित्रात / अंदाजपत्रकीय रकमेत कोणत्याही प्रकारचे बदल करण्यात येऊ नयेत.

२) कार्यान्वयीन अभिकरणांनी सक्षम अधिकाऱ्यांकडून कामास तांत्रिक मंजूर घेतल्यानंतरच कामास सुरुवात करावी

३) प्रचलित शासन निर्णय, विहित निविदा कार्यपध्दती अनुसरणे, राज्य तांत्रिक सल्लागार समितीने प्रकल्पाच्या व कामाच्या अनुषंगाने दिलेल्या निदेशांचे व त्रुटींची पूर्तता करणे तसेच यापुढे वेळोवेळी होणारे बदल कार्यान्वयीन अभिकरणांवर बंधनकारक राहतील.

४) मंजूर करण्यात आलेली कामे नेमून दिलेल्या कालावधीत पूर्ण करणे आवश्यक राहील.

५) काम चालू करण्यापूर्वी शासन नियमानुसार आवश्यक त्या सर्व परवानग्या घेऊनच कामाला सुरुवात करावी.

६) काम पूर्ण झाल्यानंतर मंजूर रकमेतील बचत अन्य कामाकडे वळविण्यात येणार नाही अथवा बचतीतून नवीन कामांना / प्रस्तावांना मंजूरी देता येणार नाही.

७) नियोजन भवनाची देखभाल दुरुस्ती व विद्युत देयकासाठी जिल्हा वार्षिक योजना (सर्वसाधारण) अंतर्गत निधी मंजूर करता येणार नाही.

२. सदरचा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संगणक संकेतांक क्रमांक २०२२०४१८१२५०१४७११६ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SANJEEV
HARISHCHANDRA
DHURI

Digitally signed by SANJEEV HARISHCHANDRA DHURI
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PLANNING DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=b2040f8afae5b15468c26cd79b1393381092c74fb3501bf565f466dec2136a36, pseudonym=457F70F5FA4DEA10E909A007981CEAF0F1C5A45D, serialNumber=F955EDB9F98089D5B84355354FDE7CA14F577C3C2B384D076E4614388B1F5E7A, cn=SANJEEV HARISHCHANDRA DHURI
Date: 2022.04.18 12:52:09 +05'30'

**(सं. ह. धुरी)**

**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.उपमुख्यमंत्री (वित्त व नियोजन) यांचे खाजगी सचिव
२. मा.राज्यमंत्री (वित्त व नियोजन) यांचे खाजगी सचिव
३. प्रधान महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/ लेखापरीक्षा), महाराष्ट्र राज्य-१, मुंबई
४. प्रधान महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/ लेखापरीक्षा), महाराष्ट्र राज्य-२, मुंबई
५. विभागीय आयुक्त, नाशिक
६. जिल्हाधिकारी तथा सदस्य सचिव, जिल्हा नियोजन समिती, नंदूरबार
७. कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, नंदूरबार

८. प्रधान सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई

९. जिल्हा कोषागार अधिकारी, नंदूरबार

१०.सार्वजनिक बांधकाम विभाग, इमारती-३, मंत्रालय, मुंबई

११.वित्त विभाग (व्यय-८/अर्थ-१६) मंत्रालय, मुंबई

१२.निवडनस्ती, कार्या.१४८१, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.